अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण
मंडळ, नवी मुंबई यांच्या अधिनस्त जिल्हा
प्रयोगशाळा, ठाणे वर्ग करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन निर्णय क्र.ईएसटी-२०२१/प्र.क्र.६०/प्रशासन-१**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक :- २९ नोव्हेंबर, २०२१**

**संदर्भ:-** मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांचे क्र.मु.अ.(को)/ परिमंडळ/१९३२, दि.२२ जुलै, २०२१ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

ठाणे जिल्ह्यातील बांधकाम प्रकल्पांची गुणवत्ता तपासण्यासाठी अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे यांच्या अधिनस्त दक्षता व गुण नियंत्रण उप विभागांतर्गत नवीन जिल्हा क्षेत्रिय प्रयोगशाळा उभारण्यात आलेली आहे. सदर प्रयोगशाळा अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नवी मुंबई यांच्या अधिनस्त देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांच्या अधिपत्याखालील अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे यांच्या अधिनस्त उपअभियंता, दक्षता व गुणनियंत्रण उपविभाग, कोपरी, ठाणे प्रशासकीय कामकाजाच्या दृष्टीने व शासनावर कोणताही अधिकचा आर्थिक भार पडणार नाही, या अटीच्या अधीन राहून, अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नवी मुंबई यांच्या अधिनस्त देण्यात येत असून, त्याचे नामाभिधान **जिल्हा प्रयोगशाळा, ठाणे** करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. जिल्हा प्रयोगशाळा, ठाणे करीता **परिशिष्ट-१ मध्ये** दर्शविल्यानुसार आवश्यक अधिकारी / कर्मचारीवर्ग समावेशनाने घेणेबाबतचा निर्णय अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नवी मुंबई यांनी अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे यांच्या सल्लामसलतीने घेण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय, दि.०४/०५/२०२० अन्वये नवीन पद निर्मितीवर निर्बंध घालण्यात

आलेले आहेत. यास्तव जिल्हा क्षेत्रिय प्रयोगशाळेसाठी आवश्यक असलेली प्रयोगशाळा सहायक व प्रयोगशाळा परिचर ही दोन पदे सद्य:स्थितीत नव्याने निर्माण न करता सदर पदाशी समकक्ष अधिकारी / कर्मचारी यांना प्रशिक्षण देऊन प्रयोगशाळेशी संबंधीत कामे करुन घेण्यात यावी.

४. जिल्हा क्षेत्रिय प्रयोगशाळेसाठी उपलब्ध करुन दिलेले प्रशिक्षित अधिकारी / कर्मचारी यांच्या बदल्या त्यांच्या सदर कार्यरत पदावरील पदावधी पूर्ण होण्यापूर्वी करण्यात येऊ नयेत. जेणेकरुन शासनाचा प्रशिक्षणावरील वेळ व खर्च वाया जाणार नाही.

५. नवनिर्मित जिल्हा प्रयोगशाळा कार्यान्वयित करण्यासाठी आवश्यक / कमी असलेली उपकरणे तथा

साधन सामुग्रीची (स्थापत्य/विद्युत) पूर्तता अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नवी मुंबई यांनी करावी.

६. अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नवी मुंबई यांच्याकडे वर्ग करण्यात येणाऱ्या जिल्हा प्रयोगशाळा, ठाणे मधील अधिकारी / कर्मचारी यांचे आर्थिक वर्ष सन २०२१-२२ करीता वेतन व भत्ते अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे यांनी " मागणी क्र.एच-६, २०५९-सार्वजनिक बांधकामे, ८०-सर्वसाधारण, ००१- संचालन व प्रशासन, (०३) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, (०३) (०२) कार्यान्वयन, संगणक सांकेतांक-२०५९०८९३, ०१- वेतन " या लेखाशिर्षामधून भागविण्यात यावेत.

तद्नंतर पुढील आर्थिक वर्षापासून (एप्रिल-२०२२ पासून) या अधिकारी कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नवी मुंबई या कार्यालयाकडून अदा करण्यात यावेत. याकरीता " उप विभागीय अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नवी मुंबई " यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२१११२९१४५७१३६११८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=23b2f1b1fd914a87080cb68712db5efd17f65e69284fe1d3274a32de69eb6a25, serialNumber=10d36944a4b86eab516b1b70183709c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2021.11.29 15:01:20 +05'30'

**( वि.नि.ढमाळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति-**

१. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री (सा.बां.) / मा. राज्यमंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद यांचे खाजगी सचिव.
४. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२.
५. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
६. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
७. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण.
९. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे.
१०.अधीक्षक अभियंता, दक्षता व गुण नियंत्रण मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई.
११. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.१, ठाणे.
१२. कार्यकारी अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
१३. जिल्हा कोषागार / उपकोषागार अधिकारी, ठाणे / नवी मुंबई.
१४. कार्यासन अर्थसंकल्प-३ / सेवा-२/ सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. कार्यासन प्रशासन-१ (निवडनस्ती), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

**शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक :- ईएसटी-२०२१/प्र.क्र.६०/प्रशा-१, दिनांक :- २९ नोव्हेंबर, २०२१ च्या सोबतचे परिशिष्ट -१**

अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नवी मुंबई यांच्या अधिनस्त जिल्हा क्षेत्रिय प्रयोगशाळा, ठाणे करीता आवश्यक पदांचा तपशील.

| अ.क्र. | ठाणे मंडळांतर्गत दक्षता व गुणनियंत्रण उपविभागाची सद्य:स्थितीत पदे | | | | दक्षता व गुणनियंत्रण मंडळांतर्गत जिल्हा प्रयोगशाळेकरीता आवश्यक पदे | | | ठाणे मंडळांतर्गत द.व.गु.नियंत्रण उप विभागातील इतरत्र समायोजन करावयाची पदे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | पदनाम | मंजूर | कार्यरत | रिक्त | पदनाम | आवश्यक पदे | ठाणे उप विभागाकडून द.व.गु.नियं. मंडळाकडे वर्ग करावयाची पदे | |
| १ | उप अभियंता | १ | १ | ० | सहायक संशोधन अधिकारी | १ | १ | ० |
| २ | शाखा अभियंता / कनिष्ठ अभियंता | ४ | ४ | ० | शाखा अभियंता / कनिष्ठ अभियंता | २ | २ | २ |
| ३ | स्थापत्य अभि. सहायक | ५ | १ | ४ | ---- | | | ५ |
| ४ | वरिष्ठ लिपिक | १ | १ | ० | ---- | | | १ |
| ५ | कनिष्ठ लिपिक | २ | २ | ० | कनिष्ठ लिपिक | १ | १ | १ |
| ६ | वाहन चालक | १ | ० | ० | | | | १ |
| ७ | शिपाई | १ | ० | १ | शिपाई | १ | १ | १ |
| ८ | चौकीदार | २ | २ | ० | चौकीदार | १ | १ | ० |
| ९ | | | | | प्रयोगशाळा सहायक | १ | ० | ० |
| १० | | | | | प्रयोगशाळा परिचर | १ | ० | ० |
| | **एकूण** | **१७** | **१२** | **५** | **एकूण** | **८** | **६** | **११** |